**शासन तसेच विभागाच्या आणि संलग्न कार्यालयाच्या वेबसाईटवरील माहिती अद्यावत ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**माहिती तंत्रज्ञान साप्रवि विभाग**
**शासन परिपत्रक क्र. मातंसं०४९/२/२०१७**
**मंत्रालय मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक:-१२.०७.२०१७**

पहा- शासन परिपत्रक मा.तं.सं २०१०/प्र.क्र.७८/३९, दिनांक: २२/०४/२०१०

परिपत्रक -

शासनाच्या आणि विविध विभागांच्या संकेतस्थळावरील माहिती अद्यावत ठेवण्याची जबाबदारी शासन परिपत्रक दिनांक २२/०४/२०१० अनुसार संबंधित विभागाच्या सहसचिव / उपसचिव (आस्थापना) यांच्याकडे देण्यात आली असून यासाठी कार्यपध्दती विहित केलेली आहे.

पंचायतीराज समिती २०१५-१६, १३ वी महाराष्ट्र विधान सभा यांनी महाराष्ट्रातील पंचायतीराज संस्थांच्या नांदेड व औरंगाबाद जिल्हापरिषदांच्या सन २००८-०९ व २०११-१२ च्या लेखांवरील लेखापरिक्षा पुनरावलोकना बाबतच्या ६व्या अहवालात शासनाचे संकेतस्थळ परिपूर्ण माहितीसह अद्यावत करण्याबाबत सर्व विभागांना सूचित करण्यात यावे अशी शिफारस केली आहे.

उपरोक्त पार्श्वभूमी लक्षात घेता सर्व मंत्रालयीन विभागांना पुन:श्च खालील प्रमाणे सुचना देण्यात येत आहेत.

अ) या विभागाच्या संदर्भाधीन शासन परिपत्रक दि.२२/०४/२०१० मधील सुचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

ब) प्रशासकीय विभागांनी वेळोवेळी निर्गमित केलेल्या तसेच शासन निर्णयाच्या बाबतीत सुस्पष्टता येण्यासाठी प्रशासकीय नियमांचा वापर सुकरपणे व्हावा यासाठी रद्द केलेल्या, सुधारणा केलेल्या तसेच नव्याने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, परिपत्रके, ज्ञापने, पत्रे, आदेश, विनिमय, अधिनियम शासनाच्या संकेतस्थळावर वेळच्यावेळी उपलब्ध करण्यात यावे. उपलब्ध करून देण्यात आलेले खात्री निर्णय राज्यातील शासकीय व निमशासकीय प्रशासकीय यंत्रणांना प्राप्त झाल्याची संबंधितांनी करावी.

क) विभागाचे स्वतंत्र संकेतस्थळ असल्यास शासन निर्णयाची लिंक विभागाच्या स्वतंत्र संकेतस्थळावर देण्यात यावी. जेणेकरुन विभागाच्या व शासनाच्या संकेतस्थळावरील माहिती मध्ये तफावत राहणार नाही.

२. महाराष्ट्र शासनाच्या https://www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावरील माहिती अद्यावत करण्यासाठी आवश्यक असलेली तांत्रिक मदत माहिती तंत्रज्ञान संचालनालयाकडून करण्यात येईल. या साठी mahaportalteam.dit@maharashtra.gov.in हा ईमेल अद्यावतीकरणाची माहिती पाठविण्यासाठी उपलब्ध करून देण्यात येत आहे. अद्यावतीकरणासाठी पाठवावयाची माहिती अवर सचिव व त्यापेक्षा वरिष्ठ अधिकाऱ्याच्या शासकीय ईमेल वरून पाठविण्यात यावी.

३. विभागांच्या / कार्यालयांच्या संकेतस्थळांवरील माहिती अद्यावत करण्याची जबाबदारी संबंधित विभाग / कार्यालय यांची असेल.

४. उपरोक्त बाबी सर्व मंत्रालयीन विभाग प्रमुखांनी त्यांच्या अधिपत्याखलील विभाग प्रमुख, कार्यालय प्रमुख, सार्वजनिक प्राधिकरण तसेच संबंधीतांच्या निदर्शनास आणून दयाव्यात व तद्नुसार आवश्यक कार्यवाही करण्याबाबत सूचित करण्यात यावे.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७१३११५७३२४६११ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

M Sankarnarayanan

Digitally signed by M Sankarnarayanan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DIT Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c4b1817ca73d3d2a540de5ce8b73084af6a1a96f034b50ce5a11f207224cb724, cn=M Sankarnarayanan
Date: 2017.09.20 15:15:10 +05'30'

**(एम.संकरनारायणन)**
संचालक (माहिती तंत्रज्ञान)

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव/सचिव.
३. सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. राज्य मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. सर्व राज्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. प्रबंधक, मुळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
७. प्रबंधक, उच्च न्यायालयालय, अपिल शाखा, मुंबई
८. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
९. सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवाल, मुंबई
१०. प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
११. मंत्रालयीन विभागाचे सर्व अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
१२. सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय,मुंबई
१३. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई
१४. सर्व मंत्रालयीन विभाग
१५. सर्व विभागीय आयुक्त
१६. महासंचालक, यशदा, पुणे
१७. सर्व जिल्हाधिकारी
१८. निवडनस्ती, सा.प्र.वि. कार्यासन सहा.